प्रशासकीय मान्यता :
कोविड-१९ उपाययोजनांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात आमदार स्थानिक विकास कार्यक्रम अंतर्गत मंजूर अनुदानातून व्हेंटीलेटर्सच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता.

डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, विष्णुपुरी, नांदेड

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
शासन निर्णय, क्रमांक : एसएचएन-२०२१/प्र.क्र.३०७/ प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१
दिनांक : ०५ ऑक्टोबर, २०२१

वाचा :
१) शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१४/प्र.क्र. २१५/ उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७
४) जिल्हाधिकारी, जिल्हा नियोजन समिती, नांदेड यांचे पत्र क्र. जिनिस/१२०४, दिनांक १९.०६.२०२१
५) जिल्हाधिकारी, जिल्हा नियोजन समिती, नांदेड यांचे पत्र क्र. जिनिस/१२०५, दिनांक १९.०६.२०२१
६) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संवैशिवसं/यंसाख-कोविड-व्हेन्टीलेट/ आ.स्था. वि.का /म/११४७९/२०२१, दिनांक ०३.०९.२०२१

शासन निर्णय :

उपरोक्त नमूद दिनांक ०३.०९.२०२१ च्या पत्रान्वये संचालनालयाने विभागाच्या नियंत्रणाखालील डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, विष्णुपुरी, नांदेड या संस्थेस कोविड-१९ उपाययोजनांतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात आमदार स्थानिक विकास कार्यक्रम अंतर्गत संदर्भ क्रमांक ४ व ५ अन्वये मंजूर अनुदानातून रुपये १,७७,७७,७१२/- (रुपये एक कोटी, सत्याहत्तर लक्ष, सत्याहत्तर हजार, सातशे बारा फक्त) इतक्या किंमतीची खालील तक्त्यात नमूद व्हेंटीलेटर्स खरेदी करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क | यंत्रसामुग्रीचे नाव | नग | प्रति नग | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | व्हेन्टीलेटर्स | १६ | ११,११,१०७/- | १,७७,७७,७१२/- |
| एकूण | | | | १,७७,७७,७१२/- |

अटी :-

१. सदर यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची प्रशासकीय मान्यता संस्थेस आमदार स्थानिक विकास कार्यक्रम अंतर्गत मंजूर अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर खरेदी शासन पत्र सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.करोना २०२०/प्र.क्र.५८/आरोग्य ५, दिनांक २४ मार्च, २०२० व समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये मान्यता दिल्यानुसार विविध शासन /शासन उपक्रम /हाफकीन कडील विविध दर /अन्य राज्याच्या मेडीकल कॉर्पोरेशन दर सूचीनुसार, जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली गठीत समितीकडून करण्यात यावी.

३. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वैद्यकीय शिक्षण) यांनी करावी. सदर व्हेंटीलेटर्स कोविड-१९ प्रादुर्भावामुळे उद्भवलेल्या आजारामुळे उपचारासाठी आवश्यक असल्याचे जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली गठीत समितीने प्रमाणित करणे आवश्यक आहे.

४. सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची, विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मीतीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

५. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

६. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

७. खरेदी करताना अनावश्यक खरेदी / व्दिरुक्ती टाळावी व उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेतच करण्यात यावी.सदर व्हेंटीलेटर्स पडून राहणार नाहीत, याची सर्वस्वी जबाबदारी खरेदी करणा-या अधिका-याची राहिल.

८. आपातकालीन परिस्थिती व राज्य शासनाच्या निदेशानुसार सदर व्हेंटीलेटर्स आवश्यकतेनुसार इतरत्र वापरण्यात येतील.

२. प्रस्तुत विषयी उपरोक्त यंत्रसामुग्रीसाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

| नियोजन विभाग मागणी क्रमांक - ओ-१० | | |
|---|---|---|
| ४५१५ | - | इतर ग्रामविकास कार्यक्रमावरील (भांडवली खर्च) |
| १०२ | - | सामुहिक विकास पंचवार्षिक योजनांतर्गत योजना राज्य योजना |
| (१) | - | बहुउदेशिय कार्यक्रम |
| (००) (०१) | - | आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१५ ००१२) |

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००५१७५७४०२८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=80b7aac85d2bc48d92746fc668ed758d69aeddf95746d0042863b2a0ce71dc1f, pseudonym=22F9E51BE81F4F3AE79C3DF8E5A0EFCCC3354857, serialNumber=6B133E92365A7935768A9BFA0220E77FC95C2726F4A9EB86D8D0C7E623A2B976, cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2021.10.07 12:37:21 +05'30'

( प्रकाश सुरवसे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. जिल्हाधिकारी, नांदेड
३. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, नागपूर
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, विष्णुपुरी, नांदेड.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
७. निवडनस्ती (प्रशा-१)